**जनहित याचिका क्र.११५/२०१५ प्रकरणात मा.उच्च न्यायालयात शासनाची बाजू मांडण्यासाठी नियुक्त करण्यात आलेल्या विशेष समुपदेशी यांना व्यावसायिक फी मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आस्था-२०१६/प्र.क्र.२३२/का.१**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०१७

**संदर्भ:-** १) विधी व न्याय विभागाचे पत्र क्र.६६९/२०१५/E, दिनांक २० जुलै २०१५

**शासन निर्णय :-**

सन २०१४-१५ मध्ये आयुक्त एकात्मिक बाल विकास सेवायोजन कार्यालयामार्फत खरेदी प्रक्रिया राबविण्यात आली होती. शासनाच्या खरेदी प्रक्रियेच्या अनुषंगाने वृत्तपत्रात छापुन आलेल्या बदनामीकारक मजकूराच्या आधारे श्री संदिप बापुराव अहिरे यांनी दिनांक १५.७.२०१५ रोजी जनहित याचिका क्र.११५/२०१५ मा.उच्च न्यायालयात दाखल केलेली आहे.

२. उपरोक्त जनहित याचिकेमध्ये मा.उच्च न्यायालयात विभागाच्या वतीने बाजू मांडण्यासाठी विशेष समुपदेशी म्हणून अॅड श्री नितीन प्रधान,यांची विभागाने केलेल्या विनंतीनुसार विधी व न्याय विभागाने दिनांक २० जुलै २०१५ च्या पत्रान्वये नेमणूक केली होती. सदर जनहित याचिकेची सुनावणी वेळोवेळी मा.उच्च न्यायालयात सुरु आहे. जनहित याचिका क्र.११५/२०१५ मध्ये मा.उच्च न्यायालयात शासनाची बाजू मांडल्याबद्दल अॅड श्री. नितीन प्रधान, विशेष समुपदेशी यांनी खालीलप्रमाणे फी मंजूर करण्याबाबत विनंती केलेली आहे.

| अ. क्र. | बील क्रमांक व दिनांक | दिनांक | तपशील | रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | N-७७<br>२४-११-२०१५ | १७-०७-२०१५ | कॉन्फरस फी | रु. ५०,००० |
| | | १८-०७-२०१५ | कॉन्फरस फी | रु. ५०,००० |
| | | २१-०७-२०१५ | कॉन्फरस फी | रु. ५०,००० |
| | | २७-०७-२०१५ | कॉन्फरस फी | रु. ५०,००० |
| | | २८-०७-२०१५ | कॉन्फरस फी | रु. ५०,००० |
| | | २०-०७-२०१५ | सुनावणी युक्तीवाद करण्यासाठी न्यायालयात उपस्थित राहिल्याबद्दल | रु.१,२५,००० |
| | | ०५-०८-२०१५ | सुनावणी युक्तीवाद करण्यासाठी न्यायालयात उपस्थित राहिल्याबद्दल | रु.१,२५,००० |
| | | १३-०८-२०१५ | सुनावणी युक्तीवाद करण्यासाठी न्यायालयात उपस्थित राहिल्याबद्दल | रु.१,२५,००० |
| | | २४-०८-२०१५ | सुनावणी युक्तीवाद करण्यासाठी न्यायालयात उपस्थित राहिल्याबद्दल | रु.१,२५,००० |
| | | ३१-०८-२०१५ | सुनावणी युक्तीवाद करण्यासाठी न्यायालयात उपस्थित राहिल्याबद्दल | रु.१,२५,००० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | १५-०९-२०१५ | सुनावणी युक्तीवाद करण्यासाठी न्यायालयात उपस्थित राहिल्याबद्दल | रु.१,२५,००० |
| | | १४-१०-२०१५ | सुनावणी युक्तीवाद करण्यासाठी न्यायालयात उपस्थित राहिल्याबद्दल | रु.१,२५,००० |
| | | १७-११-२०१५ | सुनावणी युक्तीवाद करण्यासाठी न्यायालयात उपस्थित राहिल्याबद्दल | रु.१,२५,००० |
| एकुण | | | | रु.१२,५०,००० |
| २ | N-१०९ २२-२-२०१६ | ०९-०२-२०१६ | सुनावणी युक्तीवाद करण्यासाठी न्यायालयात उपस्थित राहिल्याबद्दल | रु.१,२५,००० |
| | | १६-०२-२०१६ | सुनावणी युक्तीवाद करण्यासाठी न्यायालयात उपस्थित राहिल्याबद्दल | रु.१,२५,००० |
| | | | | रु.२,५०,००० |
| एकुण बील क्रमांक N-७७ व बील क्रमांक N-१०९ रक्कम | | | | रु १५,००,००० |

३. उपरोक्त जनहित याचिकेमध्ये शासनाची बाजू मांडल्याबद्दल ॲड श्री. नितीन प्रधान, विशेष समुपदेशी यांनी मागणी केलेली फीची रक्कम अदा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर बाब विचारात घेऊन ॲड श्री नितीन प्रधान, विशेष समुपदेशी यांना त्यांनी मागणी केलेली रुपये १५,००,०००/- (रुपये पंधरा लाख फक्त) इतकी व्यायसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

४. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्रमांक एक्स-२,२२५१-सेक्रेटरिएट-सामाजिक सेवा-०९०-सेक्रेटरिएट (०१) (०१) महिला व बाल विकास विभाग-२८-व्यावसायिक सेवा (२२५१०४३६) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१६-१७ या चालू वित्तीय वर्षाच्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दिनांक २९ जुलै २०१५ चे परिशिष्ट-अ,वित्तीय अधिकार नियम पुस्तीका,१९७८,भाग-पहिला,उप विभाग-दोन,महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम-१९६५ मधील वित्तीय अधिकाराच्या मर्यादेमध्ये सुधारणा,भाग-पहिला, उप विभाग-दोन,अनु.क्र.४९ मधील नियम १६६-अ, अन्वये प्रशासकीय विभागप्रमुख यांना प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५१/अर्थ-७, दिनांक ०६/०२/२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१४१५२१११११५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind P Shenoy

Digitally signed by Milind P Shenoy
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Womens And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5a1cf9161e18ca8fa3b7a2263c18944e06f156ba19752cad5615c266d0b4ffb8, cn=Milind P Shenoy
Date: 2017.03.15 13:17:17 +05'30'

**(मि.प.शेणॉय)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर

४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
५. अवर सचिव (रोख शाखा) महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय (मुळ बीलासह)
६. ॲड श्री नितीन प्रधान,११८-B,जॉली मेकर चेंबर २,विनय के शहा मार्ग,नरिमन पॉईण्ट, मुंबई-४०००२१
७. कक्ष अधिकारी,विधी व न्याय विभाग,(E शाखा) मंत्रालय,मुंबई
८. कक्ष अधिकारी,वित्त विभाग (व्यय-६) मंत्रालय,मुंबई
९. निवड नस्ती/का-६